महात्मा फुले विद्यापीठ, राहूरी अंतर्गत कृषी महाविद्यालय, नंदुरबार या महाविद्यालयाकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात निधी वितरीत करणेबाबत (दुसरा हप्ता)...
(लेखाशिर्ष २४०१ ८२९१ )

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१८/ प्र.क्र.११/ कार्यासन. ६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - २० फेब्रुवारी, २०१९.

<u>वाचा -</u>

१) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८व दि.२५/०१/२०१९
२) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग, समक्रमांक दि.११/०६/२०१८ व दि.११/०९/२०१८
३) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. कृषीवि ३९१८/प्र.क्र.९० /७-अे.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र.टी.५, २४०१, पीकसंवर्धन ७९६,जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (०३) कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान,३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२४०१ ८२९१) या लेखाशिर्षाखाली रु. १०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर तरतुदीपैकी रु.६.९२५ कोटी इतका निधी वाचा क्र.२ येथील दि.११/०६/२०१८ व दि.११/०९/२०१८ रोजीच्या शासन निर्णयांन्वये कृषी व पदुम विभागास वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधीमध्ये महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहूरी अंतर्गत कृषी महाविद्यालय, नंदुरबार या महाविद्यालयाकरीता उपलब्ध करुन दिलेल्या रु.१.९२५ कोटी इतक्या निधीचा समावेश आहे.

२. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय दि.१९/०६/२०१३ अन्वये महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहूरी अंतर्गत कृषी महाविद्यालय, नंदुरबार या महाविद्यालयाच्या अनावर्ती खर्चासाठी व ५ वर्षाच्या आवर्ती खर्चासाठी एकूण रु.४०५७.२४ लाख इतका निधी उपलब्ध करुन देण्यास प्रशासकिय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे . यास अनुसरुन कृषि व पदुम विभागाच्या वाचा क्र. ३ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहूरी अंतर्गत कृषी महाविद्यालय, नंदुरबार या महाविद्यालयाकरीता (२४०१ ८२९१) या लेखाशिर्षाखाली रु.२७.५० लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. संबंधित नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१६१८२१४३५९२४असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2019.02.20 10:15:47 +05'30'

( रविंद्र दि. औटे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव ( कृषि ), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त( कृषि) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई